**महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या नोंदीत बांधकाम कामगारांच्या आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजनेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः इबांका २०१४/प्र.क्र.१५१/काम-७,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १४ ऑगस्ट,२०१४.

**वाचा -**

१) **कामगार आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.काआ/इवइबाकाकम/२०१४/कार्या-३०/१५०२, दि.०७.०८.२०१४**

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाने नोंदीत बांधकाम कामगारांना आरोग्य व अपघात विमा योजना प्रायोगिक तत्वावर लागू करण्याचा निर्णय घेतलेला होता. त्यानुषंगाने कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ,मुंबई यांनी आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजना बांधकाम कामगारांना लागू करण्यासाठी ब्रोकर्सच्या नियुक्तीसाठी लोकसत्ता व इंडियन एक्सप्रेस या वृत्तपत्रामध्ये जाहिरात देऊन लाईफ ॲन्ड जनरल इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि. यांची "ब्रोकर " म्हणून नियुक्ती केली.

लाईफ ॲन्ड जनरल इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि. यांनी कामगार आयुक्त यांच्यावतीने ४ इंशुरन्स कंपन्यांकडून आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजनेबाबत कोटेशन मागवून ४ कंपन्यांकडून प्राप्त झालेले कोटेशन्स कामगार आयुक्त यांना सादर केले. सदर कोटेशन्सनुसार कामगार आयुक्त यांनी न्यु इंडिया अश्योरन्स कंपनीच्या रु.३६४५/- + सेवाकर १२.३६% + रु.५५/- असे एकंदर रु.४१५०/- प्रति कामगार एवढया रकमेची प्रिमियम असलेली आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजना दि.२३.०७.२०१३ च्या पत्रान्वये मंजूर केली.

आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजनेअंतर्गत महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळातर्फे एकूण ९४२४४ नोंदित बांधकाम कामगारांसाठी एकूण रक्कम रु.३७,०३,१७,१०५/- एवढी रक्कम प्रिमियम पोटी न्यु इंडिया अश्योरन्स कंपनीला अदा केली आहे. तथापि, आजमितीस केवळ ९७८ बांधकाम कामगारांना रु.३,८२,६६,०४८/-इतक्याच रकमेचा लाभ सदर विमा योजनेअंतर्गत मिळालेला आहे. आरोग्य व अपघात विमा योजनेबाबत मंडळाने भरलेले रु.३७

कोटीचे प्रिमियम विचारात घेता कामगारांना मिळालेला लाभ हा अत्यल्प लाभ (cost benefit ratio) आहे. सदर विमा योजनेचा कालावधी दि.२५.०७.२०१४ रोजी संपुष्टात आलेला आहे. मंडळातील नोंदीत बांधकाम कामगारांसाठी घेतलेली सदरची विमा योजना फारशी फलदायी ठरली नाही.

महाराष्ट्र शासनामार्फत एक लाख रुपयांपेक्षा कमी उत्पन्न असलेल्या कुटुंबास लागू करण्यात आलेल्या राजीव गांधी जीवनदायी योजनेचा लाभ बांधकाम कामगार घेऊ शकतात. तथापि सदरहू योजनेसाठी दारिद्रय रेषेखालील कुटुंबे पात्र ठरतात. त्यामुळे मंडळाकडील सर्वच नोंदीत बांधकाम कामगारांना राजीव गांधी जीवनदायी योजनेचा सरसकट लाभ मिळत नाही. तसेच जनश्री विमा योजना व राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना इ.योजनांचा लाभही मर्यादित कुटुंबानाच मिळतो. त्यामुळे मंडळाकडील नोंदीत बांधकाम कामगारांच्या भविष्याचा विचार करुन मंडळाने राज्य व राष्ट्रीय स्तरावरील विविध पर्यायांची चाचपणी केली.

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ व मंडळाच्या तज्ञ समितीच्या दिनांक ३०.०७.२०१४ रोजीच्या स्वतंत्रपणे झालेल्या बैठकांमध्ये सर्व पर्यायांच्या विचाराअंती नोंदीत बांधकाम कामगारांना आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजना लागू करण्याचा ठराव पारीत करण्यात आला. सदर ठरावाच्या अनुषंगाने पूर्वी अस्तित्वात असलेल्या कंसल्टंट लाईफ ॲन्ड जनरल इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि. व न्यु इंडिया अश्योरन्स विमा कंपनी यांनी पूर्वीचा ३७ कोटी रुपयांचा प्रस्ताव कमी करुन दिलेल्या २० कोटी रुपयांच्या सुधारित प्रस्तावास पुढील ३ वर्षाच्या कालावधीसाठी शासन मान्यता देण्याबाबत बांधकाम कामगार मंडळाच्या बैठकीच्या इतिवृत्तासह कामगार आयुक्त कार्यालयाने प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावावर शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या तज्ञ समितीने केलेल्या शिफारशीस अनुसरुन मंडळाने दि.३०.०७.२०१४ च्या बैठकीत ठराव पारित केला आहे. सदर ठरावाच्या अनुषंगाने कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ,मुंबई यांनी दि. ०७.०८.२०१४ च्या पत्रान्वये मंडळाच्या नोंदीत बांधकाम कामगारांना आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. कंसल्टंट लाईफ ॲन्ड जनरल इन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि. व न्यु इंडिया अश्योरन्स विमा कंपनी यांनी पूर्वीचा ३७ कोटी रुपयांचा प्रस्ताव सुधारित करुन दिला असून सुधारित प्रस्तावाची रक्कम रु.२०,००,००,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) एवढी आहे. तेव्हा रु.२०,००,००,०००/- (अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) च्या सुधारित प्रस्तावास, पुढील १ वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. विषयांकित आरोग्य व वैयक्तीक अपघात विमा योजना लागू करण्याकरिता मंडळाने विहित व पारदर्शक कार्यप्रणालीचा अवलंब करणे आवश्यक आहे.

२. उपरोक्त बाबीवर होणा-या खर्चात कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही, याची सर्वस्वी जबाबदारी कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ,मुंबई यांची राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१४१७२२२६१३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digambar Sonusing Rajput

Digitally signed by Digambar Sonusing Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Digambar Sonusing Rajput
Date: 2014.08.14 18:33:27 +05'30'

(दि.सो.राजपूत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव,
२. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक,
३. उप सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक,
४. कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, मुंबई,
५. महालेखापाल(लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
८. निवडनस्ती (कामगार ७).